**महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पामधील कर्मचारी / अधिकारी यांच्या सेवा पुढे सुरु ठेवण्यास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः कृपमं१०१८/प्र.क्र.१८१/२१-स**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक: २४ डिसेंबर, २०१८

<u>वाचा</u> :-

१) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्रमांकः कृपमं-१०१८/प्र.क्र.१८१/२१-स, दिनांक २०.११.२०१८
२) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प यांचे पत्र क्र.एमएसीपी/पीसीयु/लेखा/११४४/२०१८, दि.२७.११.२०१८

<u>प्रस्तावना</u> :-

महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पाच्या समाप्तीनंतर प्रकल्पांतर्गत विहित घटकांवर झालेल्या पात्र खर्चाची प्रतिपूर्ती जागतिक बँकेकडे सादर करणे, पात्र खर्चाचे प्रतिपूर्तीचे दावे भारत सरकारच्या वित्त मंत्रालयाला सादर करणे, संपादन पश्चात आढावा घेणे, प्रकल्पांची अंमलबजावणी, अंतिमिकरण व निष्कर्षांबाबत अहवाल तयार करणे इ. कामे पूर्ण करण्याकरिता प्रकल्पावरील सर्व अधिकारी व कर्मचारी, वैयक्तिक सल्लागार व करारावरील अधिकारी / कर्मचारी यांची आवश्यकता असल्यामुळे त्यांच्या सेवा दि. ३०.११.२०१८ पर्यंत सुरु ठेवण्यास आणि जागतिक बँकेकडून समन्वय ठेवण्यासाठी प्रस्तावित कोअर प्रोजेक्ट टीम मधील १४ अधिकारी व कर्मचारी यांच्या सेवा दि. ३१.१२.२०१८ पर्यंत सुरु ठेवण्यास तसेच त्यासाठी आवश्यक रु. १२५.०० लाख इतक्या खर्चास दिनांक २०.११.२०१८ रोजीच्या शासन निर्णयानुसार मान्यता देण्यात आली आहे.

महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पातील CAIMI कक्षातील ५ वैयक्तिक सल्लागारसह ५७ कर्मचारी / अधिकारी यांच्या सेवा पुढे सुरु ठेवण्यास मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:**

महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्पाअंतर्गत प्रकल्प संचालक यांनी संदर्भ क्र. २ येथील पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार प्रकल्पातील CAIMI कक्षातील ५ वैयक्तिक सल्लागारसह ५७ कर्मचारी / अधिकारी यांच्या सेवा दि. २८.०२.२०१९ पर्यंत सुरु ठेवण्यास तसेच त्यासाठी आवश्यक असलेल्या रु. १५७.४० लाख एवढया रकमेच्या खर्चास शासन मान्यता देण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय नियोजन विभागाचे अनौसं क्र. २४६/१४३१ दि ०५.१२.२०१८ व वित्त विभागाच्या अनौसं क्र. ६४५/२०१८/व्यय-२ दिनांक १९.१२.२०१८ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०१८१२२४१४४९५९३५०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Valvi Kalu Gonya

Digitally signed by Valvi Kalu Gonya
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-Op,Marketing And Textile Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=714701fc3db9c38a46f4cd82e1e450b51a9e92eede8c323934f82edb538d3b20, cn=Valvi Kalu Gonya
Date: 2018.12.24 14:58:26 +05'30'

**( का.गो. वळवी )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.विरोधी पक्षनेता विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
२) मा.मंत्री (कृषि / पणन/पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३) मा.राज्यमंत्री (कृषि/पणन/पशुसंवर्धन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव (कृषि /पणन/ पशुसंवर्धन/वित्त/नियोजन), मंत्रालय, मुंबई
५) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
६) आयुक्त (पशुसंवर्धन), पशुसंवर्धन आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
७) अध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य वखार महामंडळ, पुणे
८) प्रकल्प संचालक, महाराष्ट्र स्पर्धाक्षम कृषि विकास प्रकल्प, पुणे
९) महासंचालक, वनामती, धरमपेठ, नागपूर
१०) पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे
११) कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, पुणे
१२) विभागीय कृषि सहसंचालक,पुणे
१३) जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था,(सर्व)
१४) उप-आयुक्त, पशुसंवर्धन, (सर्व)
१५) जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, पुणे
१६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता)
१७) जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
१८) निवासी लेखापरीक्षा अधिकारी
१९) अवर सचिव/कक्ष अधिकारी (१७-स/रोखशाखा),स.प.व व. विभाग, मंत्रालय, मुंबई ३२.
२०) निवडनस्ती (२१-स)